**रेशीम उद्योग विकास (सन २०१४-१५) केंद्र पुरस्कृत (CDP) योजनेंतर्गत केंद्र हिस्सा व राज्य हिश्श्याचा निधी वितरीत करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः केंपुयो-१११४/ प्र. क्र.४०/ रेशीम कक्ष**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ९ जानेवारी, २०१५.

**वाचा :**

१) शासन निर्णय, स. प. व व. वि. क्रमांकः रेशीम-१००७/ प्र. क्र. १९०/ रेशीम कक्ष, दिनांक १३ सप्टेंबर, २०१०
२) शासन निर्णय स. प. व व. वि. क्रमांकः रेशीम-१००७/ प्र. क्र. १९०/ रेशीम कक्ष, दिनांक १ फेब्रुवारी, २०११.
३) शासन निर्णय स. प. व व. वि. क्रमांकः रेशीम-१११२/ प्र. क्र. १७०/ रेशीम कक्ष, दिनांक २२ फेब्रुवारी, २०१३.
४) शासन निर्णय स. प. व व. वि. क्रमांकः केंपुयो-१३१४/ प्र. क्र. ७/ रेशीम कक्ष, दिनांक ५ मे, २०१४.
५) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अंदाज-२०१४/ प्र. क्र.११०/२०१३/ अर्थ-३, दिनांक १ जुलै, २०१४.
६) शासन निर्णय स. प. व व. वि. क्रमांकः केंपुयो-१११४/ प्र. क्र.४०/ रेशीम कक्ष, दिनांक १ सप्टेंबर, २०१४
७) शासन निर्णय स. प. व व. वि. क्रमांकः केंपुयो-१११४/ प्र. क्र.४०/ रेशीम कक्ष, दिनांक १६ ऑक्टोबर, २०१४
८) संचालक (रेशीम), नागपूर यांचे पत्र क्र. रे/ कार्या-९/ केंपुयो/ Cash Flow/१४-१५/२९२१, दिनांक १२ ऑगस्ट, २०१४, क्र. रे/ कार्या-९/ केंपुयो/ Cash Flow/१४-१५/३०६१, दिनांक १२ ऑगस्ट, २०१४ व क्र. रे/ कार्या-९/ केंपुयो/ निधी/१४/३४२०, दिनांक ९ ऑक्टोबर, २०१४.

**प्रस्तावना :**

राज्यात केंद्रीय रेशीम मंडळाच्या आर्थिक सहाय्याने तुती व टसर रेशीम वाढी करीता वर नमूद दिनांक १३ सप्टेंबर, २०१० व दिनांक १ फेब्रुवारी, २०११ च्या शासन निर्णयान्वये रेशीम उद्योग विकासाच्या केंद्र-राज्य हिश्श्याच्या विविध योजना राबविण्यास मंजुरी देण्यात आली आहे. बाराव्या पंचवार्षिक योजनेमध्ये केंद्र पुरस्कृत योजनेच्या मानकांमध्ये काही बदल झाल्याने सुधारीत मानकांना वर नमूद दिनांक २२ फेब्रुवारी, २०१३ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तथापि केंद्रीय रेशीम मंडळाने या योजनेमध्ये नविन बाबींचा अंतर्भाव करून सध्याच्या मानकांमध्ये बदल केला असल्याने सुधारीत मानकांना वर नमूद दिनांक ५ मे, २०१४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय

मंजुरी देण्यात आली आहे. केंद्रिय रेशीम मंडळाकडून सन २०१३-१४ मध्ये वितरीत करण्यात आलेला तथापि दिनांक ३१ मार्च, २०१४ अखेर अवितरीत राहिलेला केंद्र हिश्श्याचा निधी व त्या प्रमाणातील राज्य हिस्सा वर नमूद दिनांक १ सप्टेंबर, २०१४ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. तसेच सन २०१३-१४ मध्ये वितरीत झालेला तथापि दिनांक ३१ मार्च, २०१४ अखेर अखर्चित राहिलेला केंद्र हिश्श्याचा निधी व त्या प्रमाणातील राज्य हिस्सा वर नमूद दिनांक १६ ऑक्टोबर, २०१४ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे.

सन २०१४-१५ मध्ये वस्त्रोद्योग मंत्रालय, नवी दिल्ली यांच्या विविध पत्रांन्वये Catalytic Development Programme या योजनेसाठी पहिल्या हफ्त्यात रु. ४९७.६५ लाख एव्हढा केंद्र हिस्सा प्राप्त झाला असून दुस-या हफ्त्यात रु. २४६.३७ लाख निधी प्राप्त झाला आहे. सदर केंद्र हिश्श्याचा निधी व त्या प्रमाणातील राज्य हिश्श्याचा अनुक्रमे रु. २४८.७९ लाख व रु. १३१.९९ लाख निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव रेशीम संचालनालयाने वर क्र. ८ येथे नमूद पत्रांन्वये शासनास सादर केला आहे. त्यानुसार केंद्र हिश्श्याचा एकूण रु. ७४६.४४ लाख व त्या प्रमाणातील राज्य हिश्श्याची रु. ३७८.३६ लाख वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :**

वर नमूद केल्याप्रमाणे रेशीम उद्योग विकासाच्या केंद्र पुरस्कृत Catalytic Development Programme (CDP) या योजनेचा सन २०१४-१५ मध्ये वस्त्रोद्योग मंत्रालय, नवी दिल्ली यांच्या कडून पहिल्या व दुस-या हफ्त्यात प्राप्त झालेला एकूण रु. ७४६.४४ लाख निधी व त्या प्रमाणातील राज्य हिश्श्याचा रु. ३७८.३६ लाख निधी वितरीत करण्यास शासन मंजुरी देत आहे.

सदर तरतूद खर्च करण्यासाठी संचालक (रेशीम) यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत असून त्यांनी ती संबंधित आहरण व संवितरण अधिका-यांना वितरीत करावी. सदर तरतूद BDS प्रणालीवर वितरीत करण्यात आली आहे.

सदर निधी १२ व्या पंचवार्षिक योजनेच्या सुधारीत मानकांना दिलेल्या प्रशासकीय मंजुरीनुसार व त्या संदर्भातील मार्गदर्शक सूचनांनुसार खर्च करावी. तसेच ज्या योजनांसाठी व बाबींसाठी केंद्र शासनाने निधी उपलब्ध केला आहे त्याच बाबींवर सदर निधी खर्च होईल याची दक्षता संचालक (रेशीम) यांनी घ्यावी.

अनुदानाच्या रकमा लाभार्थ्यांना त्यांच्या बँक खात्यावर ECS द्वारे वर्ग होतील याची दक्षता रेशीम संचालनालयाने घ्यावी. कोणत्याही प्रकरणी लाभार्थी शेतक-यांना धनादेश( Cheque )/ धनाकर्ष ( Demand Draft ) किवा रोखीने ( By Cash) निधीचे वितरण करण्यात येवू नये.

वितरीत करण्यात आलेल्या निधीतून झालेल्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनाच्या संबंधित विभागास व शासनास विहित मुदतीत सादर करण्याची कार्यवाही संचालक (रेशीम) यांनी करावी.

सदरचा खर्च केंद्र हिश्श्यासाठी " मागणी क्र. व्ही-२, लेखाशिर्ष-२८५१- ग्रामोद्योग व लघुद्योग-११० संमीश्र ग्रामोद्योग व लघुद्योग आणि सहकारी संस्था (०२) (४९) रेशीम उद्योगाचा विकास (केंद्र पुरस्कृत) (२८५१ १२६९), ३१, सहायक अनुदाने" या खाली सन २०१४-१५ या वर्षासाठी उपलब्ध असलेल्या रु. ३०३४.२७ लाख तरतूदीतून तसेच राज्य हिश्श्यासाठी " मागणी क्र. व्ही-२, लेखाशिर्ष-२८५१- ग्रामोद्योग व लघुद्योग-११० संमिश्र ग्रामोद्योग व लघुद्योग आणि सहकारी संस्था (०२) (४५) रेशीम

उत्पादन उद्योगाचा विकास, खादी ग्रामोद्योग (२८५१ १२०४), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) " या खाली सन २०१४-१५ या वर्षासाठी उपलब्ध असलेल्या रु. १४०३.५० लाख निधीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या व वित्त विभागाच्या सहमतीने, नियोजन विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र. ३०६/१४३१ दिनांक ३ डिसेंबर, २०१४ तसेच वित्त विभागाच्या अनौ. सं. क्र. ६००/१४/व्यय-२ दिनांक ५ डिसेंबर, २०१४, अनौपचारिक संदर्भ क्र. २९०/ २०१४-१५/अर्थोपाय, दिनांक १ जानेवारी, २०१५ व अनौपचारिक संदर्भ क्र. १/ अर्थसंकल्प-१३, दिनांक ३ जानेवारी, २०१५ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१०९१४४१२२१००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vilas Ramdas Thakur

Digitally signed by Vilas Ramdas Thakur
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=CMTD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vilas Ramdas Thakur
Date: 2015.01.09 14:50:00 +05'30'

**( वि. रा. ठाकूर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१-२, (लेखापरीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर
२. वरिष्ठ उपमहालेखापाल (पडताळणी), बाह्य लेखा परीक्षा विभाग (नागरी), मुंबई
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
५. सर्व जिल्हाधिकारी (मुंबई व मुंबई उपनगरे वगळून)
६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
७. नियोजन विभाग (का- १४३१) मंत्रालय, मुंबई
८. वित्त विभाग (व्यय-२/ अर्थसंकल्प-१३) मंत्रालय, मुंबई
९. संचालक, रेशीम संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर
१०. सर्व सहायक संचालक, प्रादेशिक रेशीम कार्यालये
११. सर्व जिल्हा रेशीम अधिकारी
१२. कार्यासन अधिकारी (का-१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. निवड नस्ती (रेशीम कक्ष)